**अनुदान वाटप २०११ - २०१२**
**ग्राम पंचायत सार्वत्रिक/पोट निवडणुका**

# महाराष्ट्र शासन

ग्राम विकास व जलसंधारण विभाग
शासन निर्णय क्रमांक-ग्रापंनि-२०११/प्र.क्र.४/पंरा-२,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,
दिनांक- २६ ऑगस्ट,२०११.

**वाचा:-** राज्य निवडणूक आयोग, महाराष्ट्र राज्य यांचे पत्र क्र रानिआ/ग्रापनि २०११/प्र.क्र ०६/का-०८, दिनांक १६/०८/२०११

**शासन निर्णय:-**

सन २०११-२०१२ या आर्थिक वर्षासाठी मागणी क्र. एल- २, २०५३ जिल्हा प्रशासन ०९३ जिल्हा आस्थापना-राज्यक्षेत्र (०४)(०१)(एक)- ग्राम पंचायतींच्या निवडणूका व (दोन) विभागीय ग्रामपंचायत मंडळ निवडणुका या संबंधातील खर्च (२०५३ ०९४७) (योजनेतर) (राज्यक्षेत्र) (दत्तमत) या लेखाशिर्षाखाली सन २०११-२०१२ या वित्तीय वर्षासाठी केलेल्या एकूण रूपये १४,७७,५०,०००/- (रुपये चौदा कोटी सत्त्यात्तर लाख पन्नास हजार फक्त) इतक्या अंदाज पत्रकीय तरतुदीमधून ऑक्टोबर-डिसेंबर, २०११ मध्ये मुदती संपणाऱ्या व दि. ११/०९/२०११ रोजी निवडणूक होणाऱ्या १५५ ग्रामपंचायतीच्या निवडणूक खर्चाकरिता व कार्यालयीन खर्चासाठी रुपये २७,९०,०००/- **(रुपये** सत्तावीस लक्ष नव्वद हजार फक्त) इतके अनुदान खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून सोबतच्या विवरणपत्रात दर्शविल्यानुसार संबंधित जिल्हाधिकाऱ्यांकडे सुपूर्द करण्यात येत आहे.

अ) या शासन निर्णयाद्वारे मंजूर केलेले अनुदान हे शासनाने वेळोवेळी निश्चित केलेल्या अटी व शर्तींच्या अधीन आहे.

ब) मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही, अनावश्यक खर्च होणार नाही याची दक्षता जिल्हाधिकारी यांनी घ्यावी. निवडणूक खर्चासाठी मंजूर केलेले अनुदान रु १८०००/- प्रती ग्रामपंचायत या दराने देय करण्यात आले असून जिल्हाधिकारी यांनी निवडणूकांवरील प्रत्यक्ष खर्च किंवा रु १८०००/- यापैकी जी रक्कम कमी आहे त्या रक्कमेच्या मर्यादेतच खर्च करावा.

क) ह्या अनुदानातून होणाऱ्या खर्चाची मासिक विवरणपत्रे जिल्हाधिकारी यांनी विभागीय आयुक्त व शासनाकडे प्रत्येक पुढील १५ तारखेपूर्वी सादर करावीत, खर्चावर नियंत्रण ठेवण्याची जबाबदारी विभागीय आयुक्त यांची राहील.

ड) या शासन निर्णयाद्वारे मंजूर केलेले अनुदान हे दि.२१/०९/२०११ रोजी होणाऱ्या ग्रामपंचायत निवडणूक खर्चा करीताच वापरण्यात यावे.

**इ) सदर अनुदान अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) नुसार जिल्हाधिकारी यांचा युजर आयडी (युजर आयडी क्रमांक ००९३०), जिल्हाधिकारी यांचे प्रमुख लिपिक (युजर आयडी क्रमांक ०००९४८), उप जिल्हा निवडणूक अधिकारी (युजर आईडी क्रमांक ०००९३४) यांच्या युजर आईडीवर वितरीत करण्यात येत आहे.**

उपरोक्त प्रयोजनार्थ होणारा खर्च हा मागणी क्र. एल-२, २०५३ जिल्हा प्रशासन ०९३ जिल्हा आस्थापना-राज्यक्षेत्र (०४) (०१) (एक)- ग्राम पंचायतींच्या निवडणूका व (दोन) विभागीय ग्रामपंचायत मंडळ निवडणुका या संबंधातील खर्च (२०५३ ०५४७) (योजनेतर) (राज्यक्षेत्र) (दत्तमत) या लेखाशिर्षाखालील सन २०११-२०१२ या वित्तीय वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र २०११०८२६१०५००२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(गजानन.दा. लाभे)
कक्ष अधिकारी , महाराष्ट्र शासन.

**प्रत :**
१) विभागीय आयुक्त, (सर्व)
२) जिल्हाधिकारी, (सर्व)
३) महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई, नागपूर
४) महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखा व परिक्षण) मुंबई, नागपूर
५) उपायुक्त, राज्य निवडणूक आयोग, महाराष्ट्र राज्य, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई
६) जिल्हा लेखा कोषागार अधिकारी (सर्व)
७) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई.(दोन प्रती)
८) [illegible] वित्त-१, वित्त-७ व वित्त-८, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.

# विवरणपत्र

शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र: ग्रापंनि-२०११/प्र.क्र.४/पंरा-१, दि. २६ ऑगस्ट, २०११ चे सहपत्र.

(रुपये हजारात)

| अ. क्र. | जिल्हा | मुदत संपणा-या ग्रामपंचायतींची संख्या | या आदेशान्वये मंजूर करण्यात येत असलेले अनुदान | एकूण |
|---|---|---|---|---|
| | | | कार्यालयीन खर्च | |
| १ | ठाणे | १९ | ३४२ | ३४२ |
| २ | रायगड | २ | ३६ | ३६ |
| ३ | नाशिक | ४० | ७२० | ७२० |
| ४ | धुळे | १ | १८ | १८ |
| ५ | नंदुरबार | ४१ | ७३८ | ७३८ |
| ६ | जळगांव | २ | ३६ | ३६ |
| ७ | अहमदनगर | ३ | ५४ | ५४ |
| ८ | पुणे | ४ | ७२ | ७२ |
| ९ | सातारा | ४ | ७२ | ७२ |
| १० | सोलापूर | २ | ३६ | ३६ |
| ११ | परभणी | ३ | ५४ | ५४ |
| १२ | हिंगोली | १ | १८ | १८ |
| १३ | बीड | ६ | १०८ | १०८ |
| १४ | नांदेड | १ | १८ | १८ |
| १५ | उस्मानाबाद | ४ | ७२ | ७२ |
| १६ | लातूर | ८ | १८ | १८ |
| १७ | बुलढाणा | १ | १८ | १८ |
| १८ | यवतमाळ | १ | १८ | १८ |
| १९ | गोंदिया | १ | १८ | १८ |
| २० | चंद्रपूर | ९ | १६२ | १६२ |
| २१ | गडचिरोली | २ | ३६ | ३६ |
| एकूण | | १५५ | २७९० | २७९० |

(रुपये सत्तावीस लक्ष नव्वद हजार फक्त)

(ग नानन.दा. लाभे)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.